**जुई धमकडी खारभूमी योजना, ता. उरण, जि. रायगड योजनेचे नुतनीकरण कामाचे अंदाजपत्रकास प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

**शासन निर्णय क्रमांकः खाभूयो २०१९/प्र.क्र.१५१/खारभूमी**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक:- २४ सप्टेंबर, २०२१

**पहावे-** मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,कोंकण प्रदेश,मुंबई यांचे पत्र क्र. मुअ /जसंविकोप्र/ खारभूमी जुई धमकडी /सु.प्र.मा./ तां-१/३१८१, दिनांक २३/०८/२०१९.

**प्रस्तावना:-**

जुई धमकडी खारभूमी योजना, ता. उरण, जि. रायगड ही खारभूमी योजना बृहत आराखड्यात समाविष्ट आहे. केंद्र शासनाने सागरी नियमन कायदा सन १९९१ मधून त्यांचे पत्र (इंग्रजी) क्र. जे/१७००११/(३२) २००१-१ ए- III दि. २२ ऑगष्ट २००३ अन्वये ५७५ खारभूमी योजनेच्या कामांना सूट दिली आहे. त्यामध्ये या योजनेचा समावेश आहे. संधानक बांधकामातील सा.क्र. १७५ मी., सा.क्र. २२० मी., सा.क्र. २१०२ मी., सा.क्र. २९७३ मी., सा.क्र. ३५८३ मी. अशा ५ आयताकृती उघाडया आहेत . बांधाची जास्तीत जास्त उंची ३.८२ मी. व बांधाची माथ्याची रुंदी ३.०० मी. आहे. नियमितच्या भरती ओहोटी, अतिवृष्टी व मोठ्या उधाणामुळे योजनेच्या बांधाची व उघाडीची धूप झालेली आहे. त्यामुळे बांधाचे बळकटीकरण व उघाड्यांची दुरुस्ती करणे आवश्यक असल्याने शासन निर्णय दि. १९.०६.२०१६ अन्वये रु. ३.१७ कोटींच्या नुतनीकरणाच्या कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली होती. तथापि योजनेचे उर्वरित काम पूर्ण करण्यासाठी येणारा खर्च हा मूळ प्रशासकीय मान्यता अंदाजपत्रकापेक्षा जास्त होणार असल्याने अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता घेणे आवश्यक आहे. कामाची निकड, स्थानिक लोकप्रतिनिधी व ग्रामस्थ यांचे मागणीवरुन सदर योजना प्रस्तावित असून सदर योजनेस **जुई धमकडी खारभूमी योजना** असे नांव देण्यात आलेले आहे. योजनेचा बांध दुहेरी संरक्षित प्रस्तावित आहे. योजनेचा पुन:प्रापित क्षेत्रानुसार प्रतिहेक्टरी खर्च रु. १,६६,०२१/- इतका येत असून तो सध्याचा प्रचलित आर्थिक मापदंड रु. १,९२,९५०/- पेक्षा कमी आहे

मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांच्याकडून संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेला जुई धमकडी खारभूमी योजनेच्या नूतनीकरणाच्या कामास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

जुई धमकडी खारभूमी योजना, तालुका उरण, जिल्हा रायगड या योजनेच्या नूतनीकरणाच्या कामास खारभूमी विभागाच्या सन २०१७-१८ या वर्षाच्या दरसूचीवर आधारित अंदाजित रूपये ५,०९,६८,४०७/- (रुपये पाच कोटी नऊ लक्ष अडुसष्ठ हजार चारशे सात फक्त) एवढया रक्कमेस याव्दारे प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. कामाकरिता रुपये ५,०८,६२,८४६/- (रुपये पाच कोटी आठ लक्ष बासष्ठ हजार आठशे शेहेचाळीस फक्त) व अनुषंगिक कामाकरिता रुपये २५,२८,००२/- (रुपये पंचवीस लक्ष अठ्ठावीस हजार दोन फक्त), गौण खनिज करिता रुपये ५३,३९,२२९/- (रुपये त्र्येपन्न लक्ष एकोणचाळीस हजार दोनशे एकोणतीस फक्त) व १ टक्का विमा रकमेपाटी रु. ५,०८,६२९/- (रुपये पाच लक्ष आठ हजार सहाशे एकोणतीस फक्त) व निविदा १६.२६% कमी दराने येणारी किंमत (-) ८२,७०,२९९/- अशी तरतूद असून तरतुदींचा उपशीर्षवार गोषवारा सोबतच्या परिशिष्टामध्ये देण्यात येत आहे. सदरील सुधारित प्रशासकीय मान्यता पुढील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१. योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-५, मुख्य लेखाशिर्ष "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२) मृद संधारण (०१) खार जमीन योजना (०१) बांधकामे (योजनांतर्गत) (४४०२०३८४)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

२. शासन निर्णय, जलसंपदा विभाग, दिनांक २२.६.२०१५ मधील परिच्छेद क्र. २(१) व २(२) मधील तरतुदींनुसार खारभूमी योजनेचे बांधकाम सुरु करण्यापूर्वी लाभधारकांनी सहकारी संस्था स्थापन करावी व खारभूमी योजना पूर्ण करण्यासाठी पुन:प्रापित क्षेत्रातील लाभधारकांकडून प्रकल्पातील सहभाग म्हणून रुपये ५००/- प्रती हेक्टर खर्च (किमान रुपये २००/- रोख व रुपये ३००/- मजूरीच्या स्वरुपात किंवा रोखीने) घेण्यात यावा. योजनेचे काम पूर्ण झाल्यानंतर योजना देखभाल व दुरुस्तीसाठी त्यांच्याकडे हस्तांतरित करणे आवश्यक राहील.

३. योजनेची अंमलबजावणी करताना प्रचलीत शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा, विहित निविदा कार्यपध्दती अनुसरणे याची सर्वस्वी जबाबदारी संबंधीत क्षेत्रिय कार्यालयांची राहील.

४. सदर प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी,निविदाविषयक क्षेत्रिय निर्णय किंवा अनियमितता यांस मान्यता गृहित धरली जाणार नाही. अशा प्रकरणाची तपासणी त्यावेळच्या प्रचलित शासन नियमानुसार करण्याची जबाबदारी संबंधीत क्षेत्रिय कार्यालयांची राहिल.

५. सदर कामासाठी विहित मार्गाने तरतूद अर्थसंकल्पित केल्याशिवाय त्यावर खर्च केला जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

६. या कामाकरीता पर्यावरण विषयक तसेच इतर सर्व वैधानिक मान्यता घेतल्यानंतरच प्रत्यक्ष काम सुरु करावे.

७. सदर प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता देणेपूर्वी अथवा नंतरही या कामावर कोणतीही अनियमितता झालेली असल्यास अथवा आढळल्यास सदर प्रशासकीय मान्यता प्रदान केल्याने ती नियमीत झालेली आहे असे गृहीत धरता येणार नाही.

८. या योजनेबाबत चालू असलेल्या अथवा प्रस्तावित विभागीय चौकशीची कार्यवाही पूढे चालू ठेवावी. सदर प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे सध्या सुरू असलेल्या अथवा भविष्यात उद्भवणा-या विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहचणार नाही.

९. सदर योजनेसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रथम प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. या संदर्भात प्रचलित शासन निर्णय, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपद्धती यांचे काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

१०. सदर प्रकल्पाच्या प्रस्तावित प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यतेमध्ये अंतर्भूत किंमतीला तांत्रिक मान्यत प्राप्त करून घ्यावी.

११. संपूर्ण प्रकल्प हा सदर प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करावा.

सदरहू शासन निर्णय शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-१०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम भाग-२, दिनांक १७.०४.२०१५, भाग पहिला, उपविभाग तीन, अनुक्रमांक ४, परिच्छेद क्रमांक २७(२) अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार आंतरवित्त सल्लागार व उप सचिव तसेच नियोजन विभागाच्या (कायार्सन-१४३४) यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५७/२०२१, दिनांक १६/०३/२०२१ नुसार दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता ल. पा. कार्यासनाच्या नोंदवहीत २१६ या अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१०९२४१५३१५७५६२७ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

**सहपत्र:**- परिशिष्ट अ

SUSHMA RAJEEV KUDAL

Digitally signed by SUSHMA RAJEEV KUDAL
DN: CN = SUSHMA RAJEEV KUDAL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2021.09.24 15:33:14 +05'30'

**( सुषमा कुडल )**
अवर सचिव

**प्रतिलिपी :-**

१. मा.मंत्री (खार जमिनी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा.राज्यमंत्री (खार जमिनी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

४. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

५. महालेखापाल१/२, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.

६. महालेखापाल१/२, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर.

७. मुख्य अभियंता,(दवप्र) व सहसचिव यांचे स्वीय सहाय्यक,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

८. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई.

९. आंतर वित्त सल्लागार व उपसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०. उपसचिव (लघु पाटबंधारे) यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

११. प्रकल्प संचालक व अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे.

१२. अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३. अवर सचिव,अर्थ शाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१४. अवर सचिव, वित्त विभाग/अर्थ-२,मंत्रालय, मुंबई.

१५. खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.

(शासन निर्णय जलसंपदा विभाग क्रमांकः खाभूयो २०१९/प्र. क्र.१५१/ खारभूमी
दिनांक २४/०९/२०२१ चे सहपत्र)

परिशिष्ट अ

**जुई धमकडी खारभूमी योजना, ता. उरण, जि. रायगड योजनेचे नुतनीकरण कामाचे अंदाजपत्रकास प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रस्तावातील उपशीर्षनिहाय तरतुदी**

(रुपये लक्ष)

| अ.क्र. | उपशीर्ष | अंदाजपत्रकीय किंमत |
|---|---|---|
| १ | अ- प्राथमिक कामे | ०.०० |
| २ | ब- भूमी संपादन | ०.०० |
| ३ | क- कामे बंधारा | २,९८,२५,७२२.०० |
| ४ | फ- आर.एच.टी. वर्क | २,१०,३७,१२४.०० |
| ५ | के- इमारती | ०.०० |
| ६ | एम- वृक्षारोपण | ०.०० |
| ७ | ओ- संकीर्ण | ०.०० |
| ८ | पी- देखभाल | ०.०० |
| ९ | आर- दळणवळण | ०.०० |
| | **एकूण कामे रुपये** | **५,०८,६२,८४६.००** |
| | **कामाच्या बाबींवरील विमा रक्कम १%** | **५,०८,६२९.००** |
| | **एकूण रुपये** | **५,१३,७१,४७५.००** |
| | **वजा निविदा १६.२६% कमी दराने** | **८२,७०,२९९.००** |
| | **एकूण रुपये** | **४,३१,०१,१७६.००** |
| | **स्वामित्व धन शुल्क** | **५३,३९,२२९.००** |
| | **एकूण रुपये** | **४,८४,४०,४०५.००** |
| | **अनुषंगिक खर्च १०%** | **२५,२८,००२.००** |
| | **एकूण रक्कम** | **५,०९,६८,४०७.००** |

**ठळक वैशिष्ट्ये**

| | |
|---|---|
| पुन:प्रापित होणारे क्षेत्र | ३०७ हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रुपये) | रुपये १,६६,०२१/- |
| लाभव्यय गुणोत्तर | १.५० |

SUSHMA RAJEEV KUDAL

Digitally signed by SUSHMA RAJEEV KUDAL
DN: CN = SUSHMA RAJEEV KUDAL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2021.09.24 15:33:30 +05'30'

( सुषमा कुडल )
अवर सचिव